**शासकीय परिवहन सेवेतील वाहनचालक,**
**गट-क पदाचे नामनिर्देशन व पदोन्नतीने**
**<u>नियुक्तीचे प्रमाण शिथील करण्याबाबत....</u>**

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-१४२३/प्र.क्र.१४१/राशि-३

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २ जुलै २०२४

**वाचा :**

१) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.६०८/का-१२, दिनांक २ मार्च २०१७
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः एसआरव्ही-२०१६/प्र.क्र.२९०/कार्या-१२, दिनांक १९ नोव्हेंबर २०१६
३) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः संकीर्ण-३५१७/प्र.क्र.१४७/१९-अ, दिनांक १७ मार्च २०१८
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांकः संकीर्ण-१४२३/प्र.क्र.१४१/३१, दिनांक ३१ जानेवारी २०२४
५) नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई यांचे पत्र क्रमांकः शापसे/प्रशासन/२०२४/५१८, दिनांक ५ मार्च २०२४

**प्रस्तावना :**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन-३, दिनांक १७ मार्च २०१८ च्या शासन निर्णयान्वये शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई या कार्यालयासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या राजशिष्टाचार उपविभागातील उपसचिव तथा संचालक, शासकीय परिवहन सेवा यांना विभाग प्रमुख म्हणून घोषित करण्यात आले आहे. तसेच याच विभागाच्या संदर्भाधीन-२, दिनांक ११ नोव्हेंबर २०१६ च्या शासन निर्णयान्वये गट-क व गट-ड संवर्गातील पदे भरण्यासाठी नियुक्ती प्राधिकारी म्हणून विभाग प्रमुखांना घोषित करण्यात आले आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भाधीन-२, दिनांक ११ नोव्हेंबर २०१८ च्या शासन निर्णयानुसार गट-क संवर्गात नेमणुका करण्यासाठी विभाग प्रमुखांना नियुक्ती प्राधिकारी म्हणून घोषित केल्यानुसार तसेच याच विभागाच्या संदर्भाधीन-१, दिनांक २ मार्च २०१७ च्या अधिसुचनेतील नियम-५ च्या

परंतुकानुसार दिलेल्या प्राधिकारानुसार शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई या कार्यालयातील वाहनचालक, गट-क पदाच्या सेवाप्रवेश नियमातील पदभरतीचे प्रमाण शिथील करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सामान्य प्रशासन विभागाचा संदर्भाधीन-४, दिनांक ३१ जानेवारी २०२४ चा शासन निर्णय रद्द करण्यात येत आहे. याच विभागाच्या संदर्भाधीन-१, दिनांक २ मार्च २०१७ च्या अधिसूचनेतील नियम-३ मधील वाहनचालक, गट-क पदावर विहित केलेल्या पदभरतीचे प्रमाण नियम-५ च्या परंतुकान्वये दिलेल्या प्राधिकारानुसार शिथील करुन, यापुढे शासकीय परिवहन सेवेतील गट-ड संवर्गातील कार्यरत कर्मचाऱ्यांना वाहनचालक, गट-क पदावर पदोन्नतीची संधी मिळण्यासाठी वाहनचालक, गट-क संवर्गाचे नामनिर्देशन व पदोन्नती याव्दारे भरतीचे प्रमाण ९० : १० विहित करण्यात येत आहे.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७०३१६४५५६०७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DILIP NANDKUMAR DESHPANDE

Digitally signed by DILIP NANDKUMAR DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=04b1da429ec9f808e2f142fb8df848a9c440a68828f957571e8bbc53318e3a6f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9A444B962C8442B754FC8343183DBEA1519A71F4D0CD0A5CCA8BF9534EF3A0A8, cn=DILIP NANDKUMAR DESHPANDE
Date: 2024.07.03 16:56:31 +05'30'

**( दिलीप देशपांडे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव तथा मुख्य राजशिष्टाचार अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र-१ / २, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ / २, (लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर
४. नियंत्रक, शासकीय परिवहन सेवा, सर पोचखानवाला मार्ग, वरळी, मुंबई
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
७. कक्ष अधिकारी (कार्यासन-१२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती / कार्यासन-राशि-३